**मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री महोदयांचे वेतन व भत्ते आहरीत करण्याच्या पध्दतीत सुधारणा**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१३/कोषा प्र-५

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३१ जुलै,२०१५

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१३/कोषा प्र-५, दि.२०/०२/२०१५**

**प्रस्तावना -**

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इ.स्वत: आहरण व संवितरण अधिकारी आहेत. त्यांच्या वेतनाची देयके मा.मंत्री/राज्यमंत्री महोदयांच्या कार्यालयांकडून अधिदान व लेखाधिकारी कार्यालयास परस्पर पाठविण्यात येतात. राज्य मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये मा.मंत्री महोदयांचे वेतन बँकेमध्ये त्यांच्या बचत खात्यात जमा करणे व त्यांच्याकडून वेतनविषयक घेण्यात येत असलेल्या कागदपत्रांची संख्या कमी करुन वेतन अदा करण्याची प्रक्रिया सुलभ व गतीमान करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे.

महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद सदस्यांचे वेतन व भत्ते तसेच त्यांच्या स्वीय सहायकांचे पारिश्रमिक आहरण करण्याच्या पध्दतीत उपरोक्त संदर्भाकिंत शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इत्यादींचे वेतन व भत्ते बँकेमध्ये त्यांच्या बचत खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय-

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री, इत्यादींचे वेतन व भत्ते यासंबंधिची देयके महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रित अधिका-यांच्या देयकाप्रमाणे (महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र.१९) एकत्रितरीत्या सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२१ (रोख) कडून अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे दाखल केली जातील. विभागातील सद्या असलेले आहरण व संवितरण अधिकारी; अवर सचिव; या देयकांसाठी आहरण व संवितरण अधिकारी असतील.

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री, इत्यादींची वेतन देयके अधिदान व लेखा कार्यालयाकडून पारीत करुन रक्कम प्रथम ECS व्दारे सामान्य प्रशासन विभागाच्या कार्यासन-२१ ( रोख ) च्या आहरण व संवितरण अधिकारी यांच्या खात्यात जमा करुन सदर वेतनाची रक्कम थेट मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इ. यांच्या बँक खात्यात ECS/NEFT पध्दतीव्दारे जमा करण्यात येईल.

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इ.त्यांचे वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी ते स्वत: आहरण व संवितरण अधिकारी म्हणून यापुढे कार्यरत राहणार नाहीत.

वैद्यकीय प्रतिपूर्तीबाबत या अगोदर असलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात येईल व यासाठी मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इ. स्वत: आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कार्यरत राहतील. तसेच प्रवास देयकाच्याबाबतीत यापूर्वीचीच कार्यपध्दती कायम राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३११५२७३५७००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.07.31 15:54:10 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई

९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४०००० २
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५